वेतन त्रुटी निवारण समिती, २०२४ च्या कामकाजासाठी कक्ष अधिकारी यांच्या सेवा अधिग्रहीत करणेबाबत
**श्रीमती वृषाली भिंगार्डे, कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- संकीर्ण-१०२४/प्र.क्र.२६/प्रशा-२(१४ब)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- ०४ एप्रिल, २०२४

**वाचा:-** वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: वेपुर-११२३/प्र.क्र.१७/सेवा-९, दि.१६.०३.२०२४

**<u>शासन आदेश</u>**

उपरोक्त वाचा येथील शासन निर्णय दिनांक १६.०३.२०२४ अन्वये सातव्या वेतन आयोगातील त्रुटींबाबत विविध न्यायालयातील दाखल रिट याचिकांच्या अनुषंगाने न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार तपासणी करुन त्याबाबत शिफारशी करण्याकरीता वेतनत्रुटी निवारण समिती, २०२४ ची स्थापना करण्यात आली असून समितीस स्थापनेच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत शासनास अहवाल सादर करावयाचा आहे. त्यामुळे वेतन त्रुटी निवारण समिती, २०२४ च्या कामकाजासाठी खालील अधिकारी यांच्या सेवा अधिग्रहीत करुन उपलब्ध करुन देण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | अधिकारी यांचे नाव | पदनाम | सध्याचा विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती वृषाली भिंगार्डे | कक्ष अधिकारी | जलसंपदा विभाग |

**२.** श्रीमती वृषाली भिंगार्डे, कक्ष अधिकारी यांच्या सेवा वेतनत्रुटी निवारण समिती, २०२४ च्या कामकाजासाठी ०६ महिने किंवा समिती आपला अहवाल शासनास सादर करणेपर्यत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यत तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहीत करण्यात येत आहेत. श्रीमती भिंगार्डे यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहीत करण्यात येणार असल्याने त्यांच्या वेतनादी विषयक बाबी जलसंपदा विभागाकडून हाताळण्यात येतील.

**३.** श्रीमती भिंगार्डे यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता दिनांक ०५.०४.२०२४ (म.पू.) रोजी वित्त विभाग/सेवा-९ येथे रूजू अहवाल सादर करावा. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित विभागाने स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही. तसेच श्रीमती भिंगार्डे यांना कार्यमुक्त न करण्यासंदर्भात संबंधित विभागाच्या कोणत्याही विनंतीची दखल घेतली जाणार नाही. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनासाठी संबंधित अधिकाऱ्यांनी रुजू होण्यास हयगय केल्यास त्यांच्या विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई प्रस्ताविण्यात येईल.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४०४११३५२४०१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2024.04.04 11:47:55 +05'30'

**( वि. बा. माने )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती वृषाली भिंगार्डे, कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग **(संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)**

**प्रत,**

१. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, वित्त विभाग व जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२. सह/ उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

३. उपसचिव (सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

४. निवडनस्ती/प्रशा-२ (१४ब)